महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या अनियतकालिक बदल्या.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कृषिआ १०२०/प्र.क्र.११२ (१४)/१६अे**
**मंत्रालय विस्तार इमारत,**
**मंत्रालय, मुंबई -३२.**
**तारीख: १० ऑगस्ट, २०२०**

**वाचा:** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.३०/कार्या.१२, दि.०७.०७.२०२० व दि.२३.०७.२०२०

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार राज्य शासकीय अधिकारी व कर्मचारी यांच्या सर्वसाधारण बदल्या दरवर्षी एप्रिल व मे महिन्यात करण्यात येतात. मात्र, कोविड-१९ संसर्गाच्या प्रादुर्भावामुळे चालू वित्तीय वर्षात दि.३१ मे, २०२० पर्यंत करावयाच्या सर्वसाधारण बदल्या व काही अपवादात्मक परिस्थितीमुळे किंवा विशेष कारणांमुळे करावयाच्या बदल्या या, दि.१०.०८.२०२० पर्यंत करण्यास उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मंजुरीने महाराष्ट्र कृषि सेवा, गट-ब (कनिष्ठ) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना महसुली विभाग बदलून देण्यात येत आहे. तसेच महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) (दोन) व ४ (५) मधील तरतुदीनुसार सदर अधिकाऱ्यांना स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पदस्थापना करण्यास देखील शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | श्री वाघमारे गणपत ज्ञानदेव, कृषि अधिकारी, तालुका कृषि अधिकारी, काटोल, जि. नागपूर | मंडळ कृषि अधिकारी, पिसर्वे, ता. पुरंदर जि. पुणे |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांनी बदलीने पदस्थापना दिलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे व तसा अहवाल आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत शासनास सादर करावा.

**३.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२००८१११६१८४६५६०१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2020.08.11 16:24:39 +05'30'

**(सु.सं.धपाटे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( ५ प्रती )

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव (कृषि) यांचे स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा) ½, महाराष्ट्र मुंबई / नागपूर.
५. संबंधित विभागीय कृषि सह संचालक/जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि), पुणे)
६. संबंधित उपविभागीय कृषि अधिकारी/कृषि उपसंचालक/तालुका कृषि अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि), पुणे
७. कृषि सह संचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि), पुणे)
९. सर्व संबंधित अधिकारी (व्दारा आयुक्त (कृषि), पुणे)
१०.निवड नस्ती/१६अे